**फोर्सवन या विशेष कमांडो पथकासाठी आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव येथील २.२७ एकर जमिन हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एएमसी-२०१४/प्र.क्र.४९/पदुम-१०**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०६ जुलै, २०१७.

**वाचा :**

1) **शासन निर्णय क्रमांकः क्र.एएमसी-१००९/प्र.क्र.२८/पदुम-८, दि.३१/१०/२००९.**
2) **विशेष पोलिस महानिरिक्षक, फोर्स वन यांचे क्र.फोर्स वन/जमिन हस्तांतरण/२०१३/४३७५, दि.२१/१०/२०१३ चे पत्र.**
3) **जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा यांचे क्र.सी/कार्या-७ अ/जमिन-४०/सीआर-२६/०९, दि.०६/११/२००९.**

**प्रस्तावना :**

आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव (पूर्व) येथील सर्व्हे नं.१४ (ब) व १४ (क) सी.टी.एस. क्र.२५८ येथील ९८.६ एकर जमिन फोर्सवन या विशेष कमांडो पथकासाठी गृह विभागास हस्तांतरित करण्यासाठी महसुल व वन विभागास प्रत्यार्पित करण्यात आली होती. सदर जागा जिल्हाधिकारी मुंबई उपनगर यांच्या संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये गृह विभागास हस्तांतरीत करण्यात आली.

तद्नंतर संदर्भाधीन क्र.२ येथील पत्रान्वये विशेष पोलीस महानिरीक्षक, फोर्स वन, महाराष्ट्र राज्य, यांनी असे कळविले की, फोर्सवन यांना हस्तांतरीत करण्यात आलेल्या ९८.६ एकर जमिनीपैकी पशुवैद्यकिय महाविद्यालयाच्या हद्दीलगत २.२७ एकर जमिन ओव्हरलॅप झाल्यामुळे फोर्सवन व पशुवैद्यकीय महाविद्यालय या दोघांच्याही नावे नकाशामध्ये दर्शविण्यात आली आहे. त्यामुळे सदर जागेऐवजी आरे दुग्ध वसाहतीतील युनिट क्र.२८ येथील नक्षत्र गार्डनला लागून असलेली जागा उपलब्ध करुन देण्यात यावी अशी विनंती विशेष पोलिस महानिरिक्षक, फोर्स वन यांनी केली आहे. यासंदर्भात मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.२३.८.२०१३ रोजी झालेल्या बैठकीत चर्चा झाली असता वर नमूद २.२७ एकर एवढे क्षेत्र पशुवैद्यकिय महाविद्यालयाच्या ताब्यात ठेवण्यात येऊन फोर्सवनला आवश्यक असणारी २.२७ एकर क्षेत्र आरे दुग्ध वसाहतीतील पर्यायी जागा उपलब्ध करून देण्याबाबत निर्देश देण्यात आले.

आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव (पूर्व) येथील सर्व्हे नं.१४ (ब) व १४ (क) सी.टी.एस. क्र.२५८ येथील ओव्हरलॅप झालेले २.२७ एकर एवढे क्षेत्र हे महसूल व वन विभागास संदर्भ क्र.१ अन्वये प्रत्यार्पित करण्यात आले असल्याने सदर जागेत करावयाच्या फेरफाराबाबतचा प्रस्ताव महसूल व वन विभागास पाठविण्यात आला. सदर प्रस्तावावर महसूल व वन विभागाने नियोजनाच्या दृष्टीकोनातून प्रथम नगर विकास

विभागाचे अभिप्राय घेण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार *"एकाच जमीन मालकाच्या जागेत आरक्षणाचे क्षेत्र कमी न करता आरक्षणाचे स्थानांतर करणेचे अधिकार आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना विनियम ११ (४) अन्वये प्राप्त आहेत. आरक्षणाचे स्थानांतर करताना त्याच्या हद्दीमध्ये बदल होणे क्रमप्राप्त आहे. त्याचप्रमाणे झोनच्या हद्दीचा प्रश्न आला तरी विकास नियंत्रण नियमावलीच्या विनियम ६४ (३) खाली शासनाच्या पूर्वमान्यतेने झोनच्या हद्दीमध्ये बदल करण्याचे अधिकार आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना प्राप्त आहेत. यासंदर्भात कलम ३७ खाली कार्यवाही करण्यास लागणारा कालावधी विचारात घेता कमी कालावधीमध्ये प्रकरण मार्गी होण्यासाठी सदरचा पर्याय सुचविण्यात आलेला आहे. तथापि, आता बृहन्मुंबई महानगरपालिकेने दि.२७/०५/२०१६ रोजी सुधारित प्रारूप विकास योजना प्रसिध्द केलेली आहे. महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम १५६ खालील तरतूदी विचारात घेता सदर अधिनियमांतर्गत परवानगी मिळाल्याशिवाय विकास कायदेशीर होणार नाही. त्यामुळे पदुम विभागाने प्रस्तावित केल्याप्रमाणे क्षेत्रामध्ये बदल होत नसलेले, पशु वैद्यकिय महाविद्यालय व फोर्स वन यांच्या हद्दीमध्ये बदल करण्याची कार्यवाही करून त्याप्रमाणे विकास योजनांमध्ये नोंद घेणेसाठी आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना कळविणे योग्य राहिल."* असे अभिप्राय नगर विकास विभागाने दिले आहेत. नगर विकास विभागाच्या उपरोक्त अभिप्रायानुसार, पशु वैद्यकीय महाविद्यालयाची मालकी अंतिम करून आरे दुग्ध वसाहतीतील युनिट क्र.२८ नक्षत्र गार्डन जवळ असलेली दुग्ध विकास विभागाच्या मालकी हक्कातील २.२७ एकर एवढी पर्यायी जागा फोर्सवन या विशेष कमांडो पथकासाठी गृह विभागाच्या अखत्यारीत उपलब्ध करून देण्याकरीता सदर जमिन महसुल व वन विभागास प्रत्यार्पित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव (पूर्व) येथील सर्व्हे नं.१४ (ब) व १४ (क) सी.टी.एस. क्र.२५८ येथील ओव्हरलॅप झालेले २.२७ एकर एवढया क्षेत्रावर पशु वैद्यकीय महाविद्यालयाची मालकी अंतिम करून आरे दुग्ध वसाहतीतील युनिट क्र.२८ नक्षत्र गार्डन जवळ असलेली दुग्ध विकास विभागाच्या मालकी हक्कातील २.२७ एकर एवढी पर्यायी जागा,फोर्सवन या विशेष कमांडो पथकासाठी गृह विभागास उपलब्ध करून देण्याकरीता सदर जमीन महसुल व वन विभागाकडे प्रत्यार्पित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देत आहे.

हे आदेश महसूल व वन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १२२७६/ज ३, दिनांक ४.४.२०१५ अन्वये तसेच नगर विकास विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३/ नवि ११, दि.२०.३.२०१७ अन्वये सहमती दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०६११०२४०५००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Tanbaji Uike

Digitally signed by Ashok Tanbaji Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87cfab3c12a61b33987277f837a341fb6c84ebe6d1bf10339d150649af95e5b8, cn=Ashok Tanbaji Uike
Date: 2017.07.06 11:03:44 +05'30'

(अ.ता.उईके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा.मंत्री (पदुम), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा.मंत्री (महसुल), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. विशेष पोलिस महानिरिक्षक, फोर्स वन, कलीना, मुंबई.
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, आरे दुग्धवसाहत, गोरेगांव, मुंबई.
११.जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा, मुंबई.
१२. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा), मुंबई.
१३. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर.
१४. गृह विभाग (पोल-७), मंत्रालय, मुंबई.
१५.महसुल व वन विभाग (ज-३), मंत्रालय, मुंबई-३२.
१६.निवड नस्ती.